२५ ३/५ ९१

महाराष्ट्रातील रस्त्यावरील अपघातस्थळ सुधारणे व अपघात निवारणासाठी समितीची स्थापना करणे.

संगणक सांकेतांक २००९०५३०१७०८२७००१

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्रमांक रस्ते सुरक्षा १०९७/१९५/रा.म.२,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक- १/१०/१९९७

शासन निर्णय

महाराष्ट्रातील रस्त्यावर होणाऱ्या अपघातांच्या आकडेवारीची तपशीलवार माहिती खात्यामार्फत महानिरीक्षक (वाहतूक) यांचेशी संपर्क साधून तयार करण्यात आली होती. सन १९९४ ते मार्च १९९७ या कालावधीतील अपघातांच्या तुलनात्मक अहवालानुसार असे दिसून येते की, गेल्या ४ वर्षात सर्व प्रकारच्या उदा. भीषण, गंभीर,लहान व किरकोळ ( Fatal; serious; slight; and minor Accidents ) अपघातांच्या संख्येत स्थिरपणे वाढ झाली असून त्यामुळे होणाऱ्या मनुष्यहानीमध्येही वाढ झाली आहे. अपघाताचे प्रमाण कमी करण्यासाठी व टाळण्यासाठी घाटांमधील निवडक अपघातजनक भागात खबरदारीच्या उपाययोजना कार्यान्वित करण्यासाठी शासनस्तरावरून सूचना निर्गमित करण्यात आल्या.

राज्यातील रस्ते वाहतूकीच्या सुरक्षिततेबाबत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १२/८/१९९६ रोजी बैठक झाली होती. या बैठकीत झालेल्या निर्णयांनुसार अपघात टाळण्यासाठी तातडीने करावयाच्या उपाययोजनेबाबतच्या सूचनाही शासनस्तरावरून देण्यात आल्या. तसेच कुमारी राजश्री परमार, मेमोरिअल फाउंडेशन, पुणे यासारख्या स्वयंसेवी संघटनेने अपघात प्रतिबंधक उपाययोजना आणि वाहतूक विषयक सावधगिरी यासंबधात कार्य केले आहे. अपघात प्रतिबंधक उपाययोजना व वाहतूक सावधगिरी या कार्याला वाहून घेणाऱ्या अशा निष्ठावंत संस्थेच्या सूचना विचारात घेणे देखिल गरजेचे आहे.

या सर्व बाबींचा सर्वकष विचार करून महाराष्ट्रातील रस्त्यांवरील वाढत्या अपघातामुळे या अपघात स्थळांची प्रत्यक्ष पाहणी करून अपघातांची कारणमिमांसा शोधून अपघात न होण्याबाबत रस्ते सुरक्षा उपाययोजना सुचविणसाठी शासनाने एक समिती स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे.

१. या समितीची रचना खालीलप्रमाणे राहिलः

| | |
|---|---|
| १) श्री श. रा. तांबे<br>माजी सचिव (सा.बां.विभाग) | अध्यक्ष<br>(अशासकीय) |
| २) सर्व प्रादेशिक मुख्य अभियंते (विद्युतसह)/<br>मुख्य अभियंता (वि.प्र.) मुंबई,<br>मुख्य अभियता (रा.म.) नवी मुंबई. | सदस्य |
| ३) पोलीस महानिर्देशक (वाहतूक)<br>महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ४) गृह विभागातील वाहतूक संबंधीचे उपसचिव | सदस्य |
| ५) महाराष्ट्र राज्य ट्रक, टेंपो, बस वहातूक महासंघाचे प्रतिनिधी. | सदस्य<br>(अशासकीय) |
| ६)वेस्टर्न ऑटोमोबाईल्सचे प्रतिनिधी | सदस्य<br>(अशासकीय) |
| ७)मुख्य अभियंता व सहसचिव,<br>सा.बां.विभाग, मंत्रालय | सदस्य सचिव |

२. वरील समितीच्या विचारार्थ रचना व कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहिल.

(अ) समितीने महाराष्ट्र राज्यातील अपघातस्थळांची प्रत्यक्ष पाहणी करणे.
(ब) अपघातांची कारणमिमांसा करणे.
(क) अपघात टाळण्याविषयी रस्ते सुरक्षा/उपाययोजना सुचविणे.
(ड) अपघात न होण्याबाबत खबरदारीची उपाययोजना सुचविणे.
(इ) कुमारी राजश्री परमार मेमोरिअल फाऊंडेशन, पुणे यासारख्या स्वयंसेवी संस्थेशी धर्मादाय संस्थेशी बिनसरकारी संस्थेशी व सर्वसाधारण जनतेशी संपर्क साधून त्यांच सहयोग मिळविणे.
(ई) उपरोक्त माहिती शासकीय मुद्रणालयातून पुस्तिकारूपात छापून घेणे.
(प) सदर समितीने आपला अहवाल तीन महिन्यात शासनाला सादर करावा.
(फ) सदर प्रकरणी पुस्तिका प्रकाशनावर होणारा खर्च "२०५९-सार्वजनिक बांधकामे-८० सर्वसाधारण, ००१ संचालन व प्रशासन (पाच) कार्यान्वयन- (०८) प्रकाशने लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल. आणि चालू वर्षाच्या एकंदर मंजूर अनुदानातू भागविण्यात येईल.

(ग

समितीच्या अशासकीय सभासदांना वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-टीआयए-१०८८/सी.आर.८५/एस.व्ही.आर-५, दिनांक १४/३/१९८८ प्रमाणे प्रवास व दैनिक भत्ता दिला जाईल. तो सा.बां.विभागाच्या मुख्य अभियंत्यांना मिळणाऱ्या भत्त्यापेक्षा कमी नसावा. या कारणास्तव उपसचिव (आस्थापना ),हे प्रतिस्वाक्षरी करणारे अधिकारी असतील. समितीचे अध्यक्ष यांना वर दर्शविलेप्रमाणे देय प्रवासभत्ता व दैनिक भत्ता इत्यादीव्यतिरिक्त इतर सुविधा देण्याबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

या समितीच्या शासकीय सदस्यांना प्रवास व दैनिक भत्यावरील खर्च हा मागणी क्रमांक- एच्-८ (सं.क्र.३४५१०२६२)३४५१-सचिवालय- आर्थिक सेवा-०९० सचिवालय (१) सा.बां.विभाग (खुद्द) (०५) कार्यालयीन खर्च याखाली विभागास मंजूर असलेल्या कार्यालयीन खर्चाखाली भागविण्यात यावा.

हे आदेश आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स्वाक्षरी)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मुख्यमंत्र्याचे सचिव,
खाजगी सचिव, उपमुख्यमंत्री,
खाजगी सचिव, मंत्री (सा.बां.)/राज्यमंत्री (सा.बां.)
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरीक्षा), मुंबई,
महालेखापाल-२ महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल-२ महाराष्ट्र (लेखापरीक्षा) मुंबई
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई
श्री.श.रा.तांबे.मार्जी सचिव(सा.बां.) विभाग,

सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता/मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, मुंबई/विद्युत मुंबई/राष्ट्रीय महामार्ग नवी मुंबई,

पोलीस महानिरीक्षक वाहतूक महाराष्ट्र राज्य,

गृह विभागातील वाहतूक संबंधीचे उपसचिव

महाराष्ट्र राज्य रस्ते वाहतूक महामंडळाचे प्रतिनिधी

वेस्टर्न इंडिया ऑटोमोबाईल्सचे प्रतिनिधी

महाराष्ट्र राज्य टेम्पो बस वाहतूक महासंघ यांचे प्रतिनिधी

उपसचिव आस्थापना, सा.बां.विभाग मंत्रालय, मुंबई,

सर्व कार्यासन अधिकारी, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.